**ग्राहक संरक्षण अधिनियम, २०१९**
**राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग व जिल्हा ग्राहक तक्रार निवारण आयोगाचे अध्यक्ष व सदस्य यांच्या नेमणूकीसाठी राज्य शासनास शिफारस करण्यासाठीच्या निवड समिती बाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : ग्रासंअ-२०२०/प्र.क्र.४९/ग्रा.सं.४**
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- १५ मार्च, २०२२.

**वाचा:** १) समक्रमांक शासन निर्णय दि. ६.११.२०२० व दि.२५.०५.२०२१.
२) महाप्रबंधक, उच्च न्यायालय , मुंबई यांचे पत्र क्र. A.१२१७/८८/४७६/२०२२, दि. १०.०३.२०२२

**प्रस्तावना :-**

ग्राहक संरक्षण अधिनियम, २०१९ अंतर्गत Consumer Protection (Qualification for appointment, method of recruitment, procedure of appointment, term of office, resignation and removal of the President and Members of the State Commission and District Commission) Rules, २०२० या नियमातील तरतूदीन्वये राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग व जिल्हा ग्राहक तक्रार निवारण आयोग यांच्या अध्यक्ष व सदस्यांची नेमणूक निवड समितीने केलेल्या शिफारशीनुसार राज्य शासनाने करणे आवश्यक आहे. सदर नियमातील निवड समितीची तरतूद विचारात घेऊन राज्य आयोग व जिल्हा आयोगाचे अध्यक्ष व सदस्य यांची नेमणूक करण्याकरिता राज्य शासनास शिफारस करण्यासाठी उपरोक्त १ येथील शासन निर्णय दि. ६.११.२०२० अन्वये मा. न्या. श्री.के.के.तातेड, उच्च न्यायालयाचे न्यायमूर्ती यांच्या अध्यक्षतेखाली निवड समिती गठित करण्यात आली होती. निवड समितीच्या रचनेनुसार या समितीमध्ये प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग (मुख्य सचिव यांनी नामनिर्देशित केलेले सदस्य) आणि सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग हे सदस्य आहेत. समितीचे अध्यक्ष मा.न्या.श्री.के.के.तातेड हे नियत वयोमानानुसार दि. १८.९.२०२१ रोजी सेवा निवृत्त झाल्यामुळे या पदावर नव्याने नियुक्ती करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. उपरोक्त २ येथील दि.१०.३.२०२२ च्या पत्रान्वये मा. उच्च न्यायालयाच्या शिफारसीनुसार निवड समिती खालीलप्रमाणे राहील.

**शासन निर्णय:-**

राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग व जिल्हा ग्राहक ग्राहक तक्रार निवारण आयोगाचे अध्यक्ष आणि सदस्य यांची नेमणूक करण्याकरिता राज्य शासनास शिफारस करण्यासाठीची निवड समिती खालीलप्रमाणे राहील.

१) मा. न्या.श्री. एस.व्ही. गंगापूरवाला, उच्च न्यायालय, मुंबई - अध्यक्ष
(मा. मुख्य न्यायाधीश यांनी नामनिर्देशित केलेले उच्च न्यायालयाचे न्यायाधीश)
२) प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई - सदस्य
( मुख्य सचिव यांनी नामनिर्देशित केलेले सदस्य)
३) सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई - सदस्य

उक्त शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२२०३१५१७४६३८४५०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHITAL ANAND RAMTEKE

Digitally signed by SHITAL ANAND RAMTEKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLY AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=250b23140177f1b91b8d23d0003fea615e62e9fa665cd65cd822d17139dee73b, pseudonym=6E8363396B2786A7F9280A0F6B79E9C7BC0E7B56, serialNumber=7D5A263499F325CA90E9E04FA83D69E04FD5CB75F96BB3FC42610EB9D879192B, cn=SHITAL ANAND RAMTEKE
Date: 2022.03.15 17:54:23 +05'30'

**( शितल रामटेके )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३. मा. मंत्री अ.ना.पु. व ग्रा.सं. यांचे खाजगी सचिव.
४. मा. विरोधी पक्ष नेता, विधानसभा/विधानपरिषद.
५. मा. राज्यमंत्री अ.ना.पु.व ग्रा.सं. यांचे खाजगी सचिव.
६. मा. अध्यक्ष, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई.
७. सर्व विधान सभा/विधान परिषद सदस्य.
८. मा. न्यायमूर्ती श्री. एस. व्ही.गंगापूरवाला,उच्च न्यायालय,मुंबई
९. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई.
१०.प्रधान सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधीद्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई
११.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे वरिष्ठ स्वीय सहायक.
१२.अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग, यांचे स्वीय सहायक.
१३.सचिव, अ.ना.पु.व ग्रा.सं.वि., मंत्रालय यांचे स्वीय सहायक.
१४.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई,/नागपूर.
१५.वित्तीय सल्लागार व उप सचिव कार्यालय, अ.ना.पु.व ग्रा.सं.वि मुंबई.
१६.प्रबंधक (प्रशासन)/प्रबंधक (विधी), राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई.
१७.संबंधित जिल्हा कोषागार कार्यालय.
१८. निवडनस्ती, ग्रासं-४.